**कामाच्या ठिकाणी महिलांच्या लैंगिक सतावणुकीशी संबंधित प्राप्त तक्रार अर्जाची चौकशी करणा-या महिला तक्रार निवारण समितीतील अशासकीय सदस्यांना दैनिक भत्ता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्र मकचौ-२०१०/प्र.क्र.४८/मकक,
नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : ०९ डिसेंबर, २०१०.

**वाचा :-** १) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-१०९९/७३/ मकअ/ दि.१९.०५.१९९९

२) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.मकचौ-२००६/प्र.क्र.१५/मकक, दि. १९.०९.२००६

**प्रस्तावना :-** कामाच्या ठिकाणी महिलांच्या होणाऱ्या लैंगिक सतावणुकीस प्रतिबंध करण्यासाठी १९९२ च्या रिट विनंती अर्ज (सी आर एल ) क्र. ६६६-७० मधील सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या न्यायनिर्णयातील मार्गदर्शक तत्वे विशाखा जजमेंट या नावाने सुपरिचित आहे. त्यानुसार राज्यस्तरावर राज्य महिला तक्रार निवारण समिती गठीत करण्यात आली आहे.

तसेच मा. सर्वोच्च न्यायालयाने डॉ. मेधा कोतवाल लेले विरूध्द केंद्रशासन याप्रकरणी दिलेल्या निर्णयान्वये सर्व शासकीय / निमशासकीय कार्यालयात व इतर संस्थेत महिला तक्रार निवारण समिती गठीत करणे बंधनकारक केले आहे.त्यानुसार सर्व शासकीय/ निमशासकीय, संस्था, महामंडळे इत्यादि कार्यालयामध्ये महिला तक्रार निवारण समिती स्थापन करण्याचे निदेश दिले आहेत. अशा समितीची अध्यक्षा ही महिलाच असावी, समितीमध्ये ५० % पेक्षा जास्त महिलांचा समावेश असावा व एका अशासकीय सदस्याचा समावेश असावा, अशी तरतूद मा. सर्वोच्च न्यायालयाने ठरवून दिलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार आहे.

महिला तक्रार निवारण समितीमध्ये अशासकीय सदस्यांचा समावेश असणे अत्यावश्यक आहे. असा समावेश नसेल तर प्रसंगी अशी चौकशी रद्द होण्याची शक्यता नाकारता येत नाही. तेव्हा महिला तक्रार निवारण समितीमध्ये अशासकीय सदस्याचे महत्व व अशा तक्रार अर्जाची चौकशी निकोपपणे पुर्ण होण्यासाठी अशा समितीच्या बैठकांना अशासकीय सदस्यांनी उपस्थित

राहण्याची गरज लक्षात घेवून त्यांना किमान येण्याजाण्याचा खर्च म्हणून दैनिक भत्ता देण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** प्रत्येक शासकीय / निमशासकीय, महामंडळ, संस्था इत्यादी कार्यालयामधील महिला तक्रार निवारण समितीमध्ये अशासकीय सदस्यांचा समावेश अपरिहार्य असून, अशा बैठकीस त्यांच्या उपस्थितीची अत्यावश्यकता लक्षात घेता अशासकीय सदस्यांना प्रत्येक बैठकीसाठी जाण्यायेण्याचा खर्च म्हणून रु ५००/- प्रमाणे दैनिक भत्ता देण्यात यावा.

सदरचा खर्च हा त्या त्या विभागाने त्यांच्याकडील उपलब्ध अनुदानातून भागवावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१०१२०९१९३७२४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
(शो. शि. मत्रे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. महिलांचे हक्क व कल्याण समिती, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. विरोधी पक्ष नेता कार्यालय, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मुख्य सचिवांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
८. शासनाचे सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (५ प्रती)
१०. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई.
११. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई.
१२. प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, औरंगाबाद / नागपूर.
१३. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई खंडपीठ, औरंगाबाद / नागपूर.
१४. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
१५. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१७. विभागीय आयुक्त, कोकण / नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर.
१८. सर्व जिल्हाधिकारी
१९. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
२०. सर्व महानगरपालिकांचे आयुक्त.
२१. सर्व नगरपालिकांचे, नगरपरिषदांचे मुख्य अधिकारी.
२२. सर्व शासकीय महामंडळे, कंपन्या, स्थानिक स्वराज्य संस्था.
२३. शासन अनुदानित मंडळे, संस्था.
२४. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना शाखा)
२५ सर्व मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.